राज्यातील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. पीडब्ल्युसी कंपनीस दि.१५.१०.२०२० ते milestone Go-Live (Part-१) पर्यंत केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-३६२०/प्र.क्र.०४/पोल-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२

**वाचा:**

१. उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्रिमिनल रिट पिटीशन क्र. २११०/२०१४ वरील दि.१३.०८.२०१४, दि.२१.१०.२०१५, दि.२४.०२.२०१६, दि.२१.०९.२०१६, दि.३०.११.२०१६, दि.१४.१२.२०१८, दि.११.०२.२०१९ व दि.०४.०३.२०१९ रोजीचे आदेश.
२. मा. सर्वोच्च न्यायालयाचे क्रिमीनल रिट पिटीशन क्र. ५३९/१९८६ वरील दि.२४.०७.२०१५ रोजीचा न्यायनिर्णय.
३. माहिती तंत्रज्ञान विभाग व मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर्स प्रा.ली. यांच्या दरम्यान झालेला करार दि.१७.११.२००९.
४. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय क्र. GAD-मातंस ०८०/४/२०१४- O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४, दि.१९.०७.२०१७, दि.०९.१०.२०१७, दि.२०.०३.२०१८ व दि.०९.०५.२०१९.
५. शासन निर्णय, गृह विभाग क्र. सीसीटी ३६१५/प्र.क्र.१३०/पोल-३, दि.१४.११.२०१९ व दि.११.१२.२०१९.
६. शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीसीटी ३६२०/प्र.क्र.०४/भाग-१/पोल-३, दि.०३.०२.२०२१.
७. मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर्स प्रा.ली., यांचे दि.२७.०८.२०२१ रोजीचे पत्र.
८. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांचे पत्र क्र. पोमसं/१७/६१६२/सीसीटीव्ही कॅमेरे (पो.ठा.)/७७/२०१९-२१, दि.१४.१२.२०२१.
९. अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांचे पत्र क्र. पोमसं/१७/६१६२/पो.ठाणे सीसीटीव्ही प्रकल्प/७७/२०१९-२२, दि.२४.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

लिओनार्ड झेविअर वल्दारीस व इतर यांनी महाराष्ट्र शासन व इतर यांचेविरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे क्रिमिनल रिट पिटीशन क्र.२११०/२०१४ दाखल केली आहे. मा. उच्च न्यायालयाने विषयांकीत याचिकेमध्ये दि.१३.०८.२०१४, दि.२४.०२.२०१६, दि.३०.११.२०१६, दि.१४.१२.२०१८, दि.११.०२.२०१९ व दि.०४.०३.२०१९ रोजी आदेश पारित केले आहेत. मा. मुंबई उच्च न्यायालयाने पोलीस कोठडीतील मृत्यु रोखण्यासाठी राज्यातील प्रत्येक पोलीस ठाण्यांमधील प्रत्येक कॉरीडॉर, रुम व लॉकअप यामध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत आदेशित केले आहे. तसेच डि.के.बसू व इतर यांनी मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये पश्चिम बंगाल राज्य आणि इतर यांचेविरुध्द क्रिमीनल रिट पिटीशन क्र.५३९/१९८६ या प्रकरणी दि.२४.०७.२०१५ रोजी निर्णय दिला आहे. मा. सर्वोच्च न्यायालयाने संवेदनशील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही बसविणेबाबत निदेश दिलेले आहेत.

शासन निर्णय, गृह विभाग क्र.सीसीटी-३६१५/प्र.क्र.१३०/पोल-३, दि.११.१२.२०१९ अन्वये मा.न्यायालयाच्या आदेशानुसार राज्यातील सर्व पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याचे काम

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. पोलीस महासंचालक कार्यालयाने दि.२०.१२.२०१९ च्या पत्रान्वये राज्यातील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून मे. पीडब्ल्युसी या सल्लागार कंपनीची नियुक्ती केली असून सदर कंपनीस पोलीस महासंचालक कार्यालयामार्फत कार्यादेश देण्यात आले. संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये मे. पीडब्ल्युसी कंपनीच्या ६ वरिष्ठ सल्लागारांना १ Man-month साठी Milestone तत्वावर दि.१५.१०.२०२० ते प्रकल्प पुर्णपणे कार्यान्वित (Go-live) होईपर्यंत मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.९ येथील पत्रान्वये अपर पोलीस महासंचालक (नि. व. स.) यांनी प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी (१- वरिष्ठ सल्लागार) यांनी Go-Live (Part-१) milestone साठी दि.१५.१०.२०२० ते दि.३०.०४.२०२१ पर्यंत केलेले काम समाधानकारक असल्याचे कळविले आहे. संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये मे. प्राईस वॉटरहाऊस कुपर्स प्रा.ली. या कंपनीने राज्यातील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी प्रकल्प सल्लागार म्हणून केलेल्या कामासाठी milestone Go-Live (Part-१) एका वरिष्ठ सल्लागाराच्या ३ Man-month चे देयक सादर केले आहे. त्यानुसार सदर देयक अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. पीड्ब्ल्युसी कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. शासन निर्णय, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय क्र.GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O माहिती तंत्रज्ञान संचालनालय, दि.०९.०५.२०१९ अन्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्यानुसार राज्यातील पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. पीड्ब्ल्युसी कंपनीने दि.१५.१०.२०२० ते milestone Go-Live (Part-१) पर्यंत पाहिलेल्या सल्लागाराच्या कामासाठी खालील तपशिलप्रमाणे (मानधन, इतर खर्च व वस्तू आणि सेवा कर मिळून) रु.९,८१,२८८/- (रुपये नऊ लाख एक्याऐंशी हजार दोनशे अठ्ठयाऐंशी फक्त) इतक्या रकमेचे देयक मे.पीड्ब्ल्युसी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| **Maharashtra Police Station CCTV Project (Project Milestone : Go-Live Part-1)** | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| # | Resource Name | Designation | Number of Man-months applicable | Man Month Rate (INR) | Deployment (Percentage) | Applicable Amount per Resource (INR) for mentioned period | Total Applicable Amount (INR) | GST @ 18% | Sub Total (INR) | OPE Claimed (INR) | Total (INR) |
| A | B | C | D | E | F | G=E*F | H | I =18% OF H | J=I+H | K | J=I+H |
| 1 | Prithwiraj Ghosh | Senior Consultant | 3 | 2,77,200 | 100% | 8,31,600 | 8,31,600 | 1,49,688 | 9,81,288 | 0 | 9,81,288 |
| **TOTAL** | | | | | | | | | | | **9,81,288** |

२. अ) उपरोक्त रकमा संदर्भ क्र.४ मध्ये नमुद शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) संदर्भ क्र.७ अन्वये मे. पीड्ब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रक्कम देण्यात येत आहे. सदर रकमेमध्ये १८% वस्तू आणि सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

क) सीसीटीव्ही प्रकल्पासाठी संबंधित कंपनीला सल्लागारांच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आहे असे निदर्शनास आल्यास अशी जादा रक्कम संबंधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

ड) सदर देयके आयकर व इतर प्रचलीत कर वजाती करून अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च "मागणी क्र. बी-१, २०५५-पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, (२०५५०१६८), १३-कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११६००१६७९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2022.03.31 16:02:59 +05'30'

**( रुपाली कबरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई.
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. मे. पीडब्ल्युसी प्रा.लि., २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर, मुंबई - ४०००२८.
८. कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती / पोल-३.

*****